महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील
अधिकाऱ्यांच्या बदल्या / नियुक्त्या.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन आदेश क्रमांकः मविसे-१०१४/प्र.क्र.१११ (भाग-१)/२०१४/आस्था-३

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई- ४०० ००१.
तारीख: १३ ऑगस्ट, २०१४.

**संदर्भ-** शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.मविसे-१०१४/प्र.क्र.१९२/ २०१४/आस्था-३, दिनांक १३ ऑगस्ट, २०१४.

**शासन आदेश-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने आणि उक्त अधिनियमाच्या कलम ४(४) व (५) मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या पूर्वमान्यतेने श्री.पी.ए. देवऋषी, सध्या नियुक्तीशिवाय (तत्कालीन उप आयुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग, नवी मुंबई) यांची या आदेशान्वये उप मुख्य कार्यकारी अधिकारी (साप्र), जिल्हा परिषद, पालघर या नवनिर्मित रिक्त पदावर नियुक्ती करण्यात येत आहे.

२. श्री.देवऋषी यांनी सदर पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. श्री.देवऋषी यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१३१४४४२५४२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bandekar-Deshmukh Sarita Rishi

Digitally signed by Bandekar-Deshmukh Sarita Rishi
DN: CN = Bandekar-Deshmukh Sarita Rishi, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = RDD
Reason: I am approving this document
Date: 2014.08.13 18:20:49 +05'30'

( सरिता बांदेकर-देशमुख )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर.
३. महालेखापाल- १ ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. श्री.पी.ए. देवऋषी, तत्कालिन उप आयुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग, नवी मुंबई (विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांच्या मार्फत)
५. मा.मंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
६. मा.राज्यमंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
७. मा.प्रधान सचिव ( ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक.
८. कार्यासन क्रमांक : आस्था- २ ग्राम विकास व जलसंधारण विभाग
९. निवड नस्ती ( कार्यासन क्रमांक : आस्था-३ ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग.